**महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेतल्या जाणाऱ्या विभागीय परीक्षांचे काम शासकीय अधिकाऱ्यांना सक्तीचे करुन ते विहित कालावधीत पूर्ण करणेबाबतच्या सूचना देणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय परिपत्रक क्र. मलोआ १०१४/प्र.क्र.१५७/८**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १ ऑगस्ट, २०१५

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र.मलोआ १००५/१९५०/प्र.क्र.१४८/०५/आठ, दिनांक १३.१२.२००५

**शासन परिपत्रक**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३२० नुसार राज्य सेवांमधील नेमणूकीसाठी परीक्षा घेण्याची कार्यवाही महाराष्ट्र लोकसेवा आयोगावर सोपविली आहे. आयोगामार्फत घेण्यात येणाऱ्या विविध मंत्रालयीन विभागांतर्गत पदोन्नतीच्या व सरळसेवा प्रवेशोत्तर विभागीय परीक्षांसाठी शासन सेवेतील अधिकाऱ्यांची प्राश्निक, परीक्षक, नियामक व तज्ञ म्हणून नियुक्ती करण्यात येते. तथापि, आयोगामार्फत नियुक्त केलेले काही अधिकारी परीक्षेचे काम नाकारत असल्याचे आयोगाने शासनाच्या निदर्शनास आणले आहे. सदर अधिकारी परीक्षेचे काम विहित कालावधीत पूर्ण करीत नसल्याने कालापव्यय होऊन परीक्षापूर्व कामास उशीर होतो. यानुषंगाने, आयोगातर्फे घेण्यात येणाऱ्या विभागीय परीक्षांच्या कामासाठी नियुक्त केलेल्या संबंधित शासकीय अधिकाऱ्यांनी, परीक्षांचे काम विहित कालमर्यादेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने, आयोगास सहकार्य करणे आवश्यक आहे. त्यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या पत्र क्र.मलोआ-१००५/१९५०/ प्र.क्र.१४८/०५/आठ, दिनांक १३.१२.२००५ नुसार सर्व मंत्रालयीन विभागांना यापूर्वीच सूचना देण्यात आल्या आहेत.

२. या परिपत्रकाद्वारे सर्व मंत्रालयीन विभागांना पुन्हा सूचित करण्यात येते कि, आयोगामार्फत घेतल्या जाणाऱ्या विविध विभागांच्या विभागीय परीक्षांचे कामकाज विहित कालमर्यादेत आणि दर्जा राखून पार पाडण्यासाठी, संबंधित विभाग/कार्यालयामधून प्राश्निक, परीक्षक, नियामक व तज्ञ म्हणून नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांना, परीक्षांचे कामकाज विहित कार्यमर्यादेत पूर्ण करुन आयोगास प्राथम्याने सहकार्य करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०११५५८४०७४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.08.01 16:04:25 +05'30'

**( डॉ. भगवान सहाय )**
अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२) सर्व मंत्रालयीन विभाग
३) निवडनस्ती